**महाराष्ट्र व्यवसायकर अधिनियम १९७५ अन्वये विशिष्ठ कालावधीत नावनोंदणीकरण /नोंदणीकरण करुन घेणा-या आणि व्यवसायकराची सर्व थकबाकी/देय रक्कम भरणा करणा-या व्यक्ती, संस्था आणि आस्थापना यांना शास्ती / व्याज आणि दंडात्मक कार्यवाही (prosecution) यामध्ये सवलत देण्याची योजना (Amnesty Scheme).**

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
शासन निर्णय क्र.पीएफटी ११०२/प्र.क्र.१०४/२००२/कराधान ३,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,दि. ३० सप्टेंबर, २००२.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र व्यवसाय, व्यापार, आजिविका आणि नोक-या यावरील कर अधिनियम १९७५ (व्यवसायकर कायदा) अन्वये व्यवसायकर भरण्यास पात्र असलेल्या व्यक्ती, संस्था आणि आस्थापना यांनी विहित कालावधीत नावनोंदणीकरण (Enrollment) अथवा नोंदणीकरण (Registration) करुन घेऊन व्यवसायकर भरणे बंधनकारक आहे. नावनोंदणीकरण अथवा नोंदणीकरण करण्यास विलंब करणे तसेच देय व्यवसायकर भरण्यास विलंब करणे याकरिता सदर कायद्यामध्ये शास्ती, व्याज आणि दंडात्मक कार्यवाही (Prosecution) करण्याची तरतूद आहे. असे असले तरी अद्यापही अनेक व्यक्ती, संस्था आणि आस्थापना नावनोंदणीकरण किंवा नोंदणीकरण करुन न घेता व्यवसायकर चुकवेगिरी करीत आहेत. तसेच अनेक करदाते देय असलेला कर भरणा करीत नाहीत, असे शासनाच्या निदर्शनास आले आहे. अशा दोषी व्यक्ती/ संस्था यांना काही सवलत दिल्यास संबंधित व्यक्ती, संस्था आणि आस्थापना नोंदणीकरण करुन घेण्यास आणि व्यवसायकर भरण्यास उदयुक्त होतील, अशी शासनाची धारणा आहे. या दृष्टीने संबंधितांना योग्य ती सवलत देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**निर्णय:-**

शासन आता असे आदेश देत आहे की,

१. दिनांक १५ नोव्हेंबर २००२ ते १४ जानेवारी २००३ या कालावधीत व्यवसायकर अधिनियमाच्या तरतूदीनुसार पात्र परंतु अनोंदित अशा संस्था ,व्यक्ती आणि आस्थापना नावनोंदणी (Enrollment) किंवा नोंदणीकरण (Registration) करुन घेऊन देय असलेली व्यवसायकराची संपूर्ण मूळ रक्कम भरणा करतील अशा अनोंदीत संस्था, व्यक्ती आणि आस्थापना यांना व्यवसायकर अधिनियमानुसार लागू होणा-या

व्याजातून १००% सूट देण्यात येईल. तसेच दंडाची आकारणी केली जाणार नाही व दंडात्मक कार्यवाही केली जाणार नाही.

२. १५ जानेवारी २००३ ते १४ मार्च २००३ या दरम्यान वरीलप्रमाणे ज्या अनोंदित व्यक्ती, संस्था आणि आस्थापना नावनोंदणीकरण (Enrollment) किंवा नोंदणीकरण (Registration) करून घेऊन संपूर्ण व्यवसायकराची रक्कम व १०% देय व्याजाची रक्कम भरणा करतील त्यांना उर्वरित व्याजाची रक्कम माफ करण्यात येईल. तसेच दंड आकारला जाणार नाही व दंडात्मक कार्यवाही केली जाणार नाही.

३. सध्या व्यवसायकर कायद्यानुसार नावनोंदित (Enrolled) व /किंवा नोंदणीकृत (Registered) व्यावसायीकांनी देय असलेल्या थकबाकीतून दिनांक १५ नोव्हेंबर २००२ ते १४ जानेवारी २००३ या दरम्यान संपूर्ण मूळ कराची रक्कम भरणा केल्यास १००% व्याज व दंड माफ केला जाईल. त्याचप्रमाणे दंडात्मक कार्यवाही केली जाणार नाही.

तसेच जर १५ जानेवारी २००३ ते १४ मार्च २००३ या दरम्यान संपूर्ण मूळ कराचा भरणा देय असलेल्या व्याजापैकी १०% व्याजाच्या रकमेसह भरणा केल्यास उर्वरित व्याजाची रक्कम व संपूर्ण दंडाची रक्कम माफ करण्यात येईल. तसेच दंडात्मक कार्यवाही केली जाणार नाही.

४. या सवलत योजनेच्या आधारे कोणत्याही प्रकारचा परतावा मंजूर करण्यात येणार नाही किंवा दिला जाणार नाही.

५. या सवलत योजनेतील तरतूदींचा आधार घेऊन कोणतेही वैधानिक आदेश पारीत करण्यात येणार नाहीत.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

एस. एन. जामोदे

**( एस.एन.जामोदे.)**

**उपसचिव, वित्त विभाग.**

**प्रति**

१. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई- ४०० ०१०.
२. अपर विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, विक्रीकर भवन, माझगांव, मुंबई- ४०० ०१०.
३. प्रधान महालेखापाल ( लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. प्रधान महालेखापाल ( लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-१, महाराष्ट्र , मुंबई.
६. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता )-२, महाराष्ट्र , नागपूर.
७. अधिदान व लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. कार्यासन अधिकारी, विक्रीकर प्रशासन-४,अर्थसंकल्प -३ , ७ वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई.
१०.. निवड नस्ती, कराधान-३ .